तिल्लरी प्रकल्पावर आधारीत पाणी पुरवठा योजनेस निधी वितरणाबाबत (लेखाशीर्ष २२१५ ए०३२)

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः निधीवि - २०२०/प्र.क्र. १५६/पापु ०७**
सातवा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल,
क्रॅाफर्ड मार्केट जवळ, लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई
तारीख: ९ नोव्हेंबर,२०२०

वाचा-

१. **शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्र.ग्रापापु-१४०९/ प्र.क्र.१४८/पापु-०६, दि.०१.०६.२०११**
२. **शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्र.ग्रापापु-१४१८/ प्र.क्र.९४/पापु-०६, दि.२८.०३.२०१९**
३. **अधिक्षक अभियंता,महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, नवीन पनवेल यांचे पत्र क्र.मजीप्रामंप/तांशा -१/११६६/सन २०२० दि.०९.१०.२०२०**

प्रस्तावना-

सिंधुदुर्ग जिल्ह्यातील तिल्लारी प्रकल्पावर आधारीत १८ गावे, वेंगुर्ला शहर व मार्गस्थ औद्योगिक क्षेत्र तसेच पर्यटन स्थळांसाठी पाणी पुरवठा योजनेस संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये रु.२१६.३७ कोटी (ढोबळ) इतक्या किंमतीच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. सदर प्रकल्पातील मे.उत्तम स्टील यांना वगळण्यात आल्याने संदर्भ.क्र.२ येथील शासन निर्णयान्वये तिल्लारी प्रकल्पावर लेखाशीर्ष २२१५ ए०३२ अंतर्गत रु.१५९.४० कोटी इतका खर्च करण्यास मान्यता देण्यात आलेली आहे. वित्तीय वर्ष २०२०-२०२१ करीता तिल्लारी प्रकल्पावर आधारित पाणी पुरवठा योजनेकरीता लेखाशीर्ष २२१५ ए०३२ खाली रु.३०.०० कोटी इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात आला आहे. सदर अर्थसंकल्पित निधीपैकी २०% प्रमाणात रु.६.०० कोटी इतका निधी वित्त विभागाने अर्थसंकल्पिय वितरण व संनियंत्रण प्रणालीवर उपलब्ध करुन दिला आहे. संदर्भ.क्र.३ च्या पत्रान्वये महाराष्ट्र जीवन प्राधिकरण कार्यालयाने तिल्लरी प्रकल्पावर आधारित पाणी पुरवठा योजनेच्या कामांचे प्रलंबित देयके अदा करण्यासाठी निधी उपलब्ध करुन देण्याची विनंती केली आहे. यास्तव, तिल्लारी

प्रकल्पाकरीता महाराष्ट्र जीवन प्राधिकरण कार्यालयास निर्ध वितरणाची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

तिल्लरी प्रकल्पाकरीता महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, सिंधुदुर्ग कार्यालयास पुर्ण केलेल्या कामांकरीता रु.६.०० कोटी इतका निधी संदर्भिय क्र.१ व २ मधील शासन निर्णयात नमुद करण्यात आलेल्या अटी व शर्तीच्या अधिन राहून मंजुर व अर्थसंकल्पिय वितरण व संनियंत्रण प्रणालीवर मूक्त करण्यात येत आहे.

२. या शासन निर्णयान्वये मूक्त करण्यात आलेला रु.६.०० कोटी इतक्या निधीबाबत ( अक्षरी- रुपये सहा कोटी फक्त) महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाचे संचालक (वित्त), (श्री.यशवंत बाबुराव पाटील) यांना महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाचे आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच अवर सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग (श्री.व.भि.माने) यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.सदर रक्कम एनईएफटी प्रणालीद्वारे महाराष्ट्र जीवन प्राधिकरण यांच्या खाती जमा करण्यात यावी.

३. या योजनेवर होणारा खर्च सन २०२०-२०२१ या वित्तीय वर्षामध्ये मागणी क्र.वाय-२, २२१५ पाणी पुरवठा व स्वच्छता, ०१ पाणी पुरवठा, १९६ जिल्हा परिषदांना सहाय्य, (०२) जिल्हा परिषदांना योजनांतर्गत अनुदाने, (०२) (०२) तिल्लारी प्रकल्पावर आधारित पाणी पुरवठा योजना (कार्यक्रम), ३१ सहायक अनुदाने (वेतनेत्तर) (२२१५ ए०३२) या लेखाशीर्षाखालील मंजुर अनुदानातून भागविण्यात यावा व त्याखाली अंतिमत: खर्ची टाकण्यात यावा.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाचे परिपत्रक क्र.अर्थसं-२०२०/प्र.क्र.६४/अर्थ-३, दि.१६.०४.२०२० नुसार या विभागास प्रदान केलेल्या अधिकारात तसेच सदर परिपत्रकातील अटी व शर्तीच्या अधीन राहून निर्गमित करण्यात येत आहे. सदर परिपत्रकामधील तसेच परिपत्रकासोबतच्या परिशिष्टातील अनुक्रमांक १ ते ९ मधील तपासणी सूचीतील अनुक्रमांक १ ते १० मधील अटी व शर्तीची पूर्तता होत असल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे.

०५. हा शासन निर्णय वित्त विभागाचे अनौ.संदर्भ क्र. २४०/व्यय-३ दि.०२.११.२०२० अन्वये प्राप्त सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२०११०६१२१३५६०२२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VASANT BHIMRAO MANE

Digitally signed by VASANT BHIMRAO MANE
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=280e2beac20f526041fee94f6226522e1407a7f6aa0b06c8769634d48c2976bc, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, ou=NA, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=VASANT BHIMRAO MANE
Date: 2020.11.09 18:17:29 +05'30'

**वसंत माने**

अवर सचिव,महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा.राज्यमंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा.अपर मुख्य सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. मा.अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
५. महालेखापाल (लेखा परीक्षा/ लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ मुंबई/ २- नागपूर
६. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई
७. विभागीय आयुक्त, कोकण विभाग, बेलापूर, नवी मुंबई
८. जिल्हाधिकारी, सिंधुदुर्ग
९. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सिंधुदुर्ग
१०.अधिक्षक अभियंता/कार्यकारी अभियंता,महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, सिंधुदुर्ग
११.कार्यासन पापु-०४/२०, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई
१२.निवडनस्ती (पापु ०७)